**केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पशुधन अभियानाच्या पशुधन विकास या उपअभियानांतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गाचा सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता पुरवणी मागणी अन्वये मंजूर केलेला निधी वितरीत करणेबाबत.**
**केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०३डी६६९, २४०३डी६२२)**
**राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २४०३डी६७८, २४०३डी६३१)**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२१/प्र.क्र.९६/अर्थसंकल्प (विघयो)**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ३१ मार्च, २०२२

वाचा :- १) शासन निर्णय/ परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१, २४.६.२०२१, दि.१४.१०.२०२१, दि.२८.१.२०२२, दि.३.२.२०२२ व दि.१७.३.२०२२
२) कृषी व पदुम विभागाची नस्ती क्र.पूरक-२०२२/प्र.क्र.२०/पदुम-४

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पशुधन अभियानाच्या पशुधन विकास या उपअभियानांतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०२१-२२ करिता मागणी क्र.एन-३, २४०३-पशुसंवर्धन, ००, ७८९-अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०७) गोंदिया, गडचिरोली व चंद्रपूर जिल्हे वगळून विशेष घटक योजनेअंतर्गत पशुधन विमा योजना (४०टक्के केंद्र हिस्सा)२४०३डी६६९, (०१) (०८) गोंदिया, गडचिरोली व चंद्रपूर जिल्हे वगळून विशेष घटक योजनेअंतर्गत पशुधन विमा योजना (३०टक्के राज्य हिस्सा) २४०३डी६७८, (०१) (०३) गोंदिया, गडचिरोली व चंद्रपूर जिल्ह्यांसाठी राष्ट्रीय पशुधन विमा योजना (५०टक्के केंद्र हिस्सा)२४०३डी६२२, (०१) (०३) गोंदिया, गडचिरोली व चंद्रपूर जिल्ह्यांसाठी राष्ट्रीय पशुधन विमा योजना (३०टक्के राज्य हिस्सा) २४०३डी६३१ या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीत तरतूद/ सुधारित अंदाज तसेच पुरवणी मागणीद्वारे अनुक्रमे रु.११०.०० लाख, रु.८२.५० लाख, रु.१२.३५ लाख तसेच रु.७.४१ लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१, दि.२८.१.२०२२, दि.३.२.२०२२ व दि.१७.३.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पशुधन अभियानाच्या पशुधन विकास योजनेअंतर्गत पशुधन विमा योजनेसाठी अनुसूचित जाती प्रवर्गासाठी वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार , (०१) (०७) गोंदिया, गडचिरोली व चंद्रपूर जिल्हे वगळून विशेष घटक योजनेअंतर्गत पशुधन विमा योजना (४०टक्के केंद्र हिस्सा)२४०३डी६६९ मध्ये रु.७०.०० लाख, (०१) (०८) गोंदिया, गडचिरोली व चंद्रपूर जिल्हे वगळून विशेष घटक योजनेअंतर्गत पशुधन विमा योजना (३०टक्के राज्य हिस्सा) २४०३डी६७८ मध्ये रु.५२.५० लाख, (०१) (०३) गोंदिया, गडचिरोली व चंद्रपूर जिल्ह्यांसाठी राष्ट्रीय पशुधन विमा योजना (५०टक्के केंद्र हिस्सा)२४०३डी६२२ मध्ये रु.४.०२ लाख तसेच (०१) (०३) गोंदिया, गडचिरोली व चंद्रपूर जिल्ह्यांसाठी राष्ट्रीय पशुधन विमा योजना (३०टक्के राज्य हिस्सा) २४०३डी६३१ रु.२.४१ लाख असा एकूण रु.१२८.९३ लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप

आयुक्त, सामाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषी व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१, , दि.२८.१.२०२२, दि.३.२.२०२२ व दि.१७.३.२०२२ रोजीच्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१, दि.२८.१.२०२२, दि.३.२.२०२२ व दि.१७.३.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वयेन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेलया अधिकारात आणि वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.४०६/व्यय-१४, दि.३०.३.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३३१११०१३६७७२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, serialNumber=5599270e38b296e5e5d814ff5976561a3ec66d875aeb425d735e1d7c12140929, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2022.04.05 17:19:35 +05'30'

(प्रशान्त पुं. वाघ)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) प्रधान सचिव, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
५) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
६) सर्व विभागीय आयुक्त,
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
९) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) कृषी व पदुम विभाग (पदुम-४), मंत्रालय, मुंबई
११) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग.